अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींच्या वसतिगृहाच्या व्यवस्थापनाकरिता निधी उपलब्ध करणेबाबत.....

सन २०२४-२५ करिता निधी वाटप

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वसगृ २०२४/प्र.क्र.२४ /का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २० मार्च, २०२५

**वाचाः-**

१. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. अविवि २००९/प्र.क्र.१५/का.८, दि.०२ मार्च, २०१०.
२. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. वसगृ-२०११/प्र.क्र.१३०/का.८, दि.२० डिसेंबर, २०११.
३. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. वसगृ-२०१२/प्र.क्र.१६८/का.८, दि.२१ जून.२०१३ ,
४. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. वसगृ-२०१२/प्र.क्र.१६८/का.८, दि.२८ जुलै, २०१५.
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.: अर्थसं -२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४ व दि.१७.०३.२०२५
६. प्राचार्य,शासकीय तंत्रनिकेतन, सोलापूर यांचे पत्र क्र. शातनिसो/अ.मु.वसतिगृह / मा. सचिव/अनुदान-२०२४-२५/२०२४/१८०६, दि.६ सप्टेंबर, २०२४
७. जिल्हाधिकारी हिंगोली यांचे पत्र क्र. जिनिसहिं/अल्प. वसतिगृह/निधी मागणी/२०२४-२५/२२८४, दि.९ ऑक्टोबर, २०२४
८. प्राचार्य , शासकिय तंत्रनिकेतन, पुणे यांचे पत्र क्र . शातंनिपु/अमुव/२०२४/४९९७, दि.१५ ऑक्टोबर, २०२४
९. जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांचे पत्र क्र. नियो/कार्या-१८/अल्पसं/२०२४/२६७३, दि. २१ नोव्हेंबर, २०२४
१०. जिल्हाधिकारी, अमरावती यांचे पत्र क्र.कक्ष-८/म.स./अल्पसंख्याक वसतिगृह/निधी मागणी/कावि-२५२/२०२४, दि. १८ मे, २०२४
११. जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्र.२०२३-साप्र/अल्पसं/वसतिगृह-२०२३-२४/कावि-५९०, दि.२६ नोव्हेंबर, २०२४

**प्रस्तावना -**

राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनीसाठी वसतिगृहे बांधण्याबाबत संदर्भाकित क्रमांक १ येथील दिनांक २ मार्च, २०१० चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. राज्यातील विविध विद्यापीठांमध्ये उपलब्ध असलेल्या जमिनीवर अल्पसंख्याक मुलींसाठी वसतिगृह बांधण्यासंदर्भातील कार्यपध्दती संदर्भाकित क्रमांक २ येथील दिनांक २० डिसेंबर, २०११ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आली आहे. तसेच अल्पसंख्याक समाजातील

विद्यार्थ्यांकरिता बांधण्यात येत असलेल्या वसतिगृहांच्या व्यवस्थापनाबाबतची कार्यपध्दती संदर्भांकित क्रमांक ३ व ४ येथील दिनांक २१ जून, २०१३ व दिनांक २८ जुलै, २०१५ रोजीच्या शासन निर्णयांन्वये निश्चित करण्यात आली आहे.

२. अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींच्या वसतिगृहाचे व्यवस्थापन व बांधकामासाठी सन २०२४-२५ करिता "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसंख्यांक समाजातील वसतीगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सुधारित अंदाजात रु.१४,००,००,०००/- इतका निधी उपलब्ध करण्यात आला आहे. संदर्भ क्र. ६ ते ११ च्या पत्रांन्वये अल्पसंख्याक विद्यार्थिनींच्या वसतिगृहाच्या व्यवस्थापनाकरीता निधी वितरित करण्याची मागणी केलेली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयास अनुसरुन सदरचा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता असलेल्या वित्तीय बंधनाच्या मर्यादेस अनुसरुन जिल्हाधिकारी, सोलापूर, हिंगोली, पुणे, अमरावती, छत्रपती संभाजीनगर, कोल्हापूर यांना त्यांच्या अधिपत्याखालील अल्पसंख्याक विद्यार्थिनींच्या वसतीगृहाच्या व्यवस्थापनाकरीता एकूण **रु.१,०५,८०,०००/-(अक्षरी रुपये एक कोटी पांच लाख ऐंशी हजार फक्त)** निधी खालीलप्रमाणे वितरित करण्यास (अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास) याद्वारे या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे :-

| **अ.क्र.** | **वसतिगृहाचे ठिकाण** | **वितरीत करावयाचा निधी** |
|---|---|---|
| **व्यवस्थापनाकरिता** | | |
| १ | शासकीय तंत्रनिकेतन, सोलापूर | रु.१७,३०,००० /- |
| २ | शासकीय तंत्रनिकेतन, लिंबाळा, हिंगोली | रु.१७,३०,०००/- |
| ३ | शासकीय तंत्रनिकेतन, पुणे | रु.१९,३०,०००/- |
| ४ | शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती | रु.१७,३०,०००/- |
| ५ | शासकीय विज्ञान संस्था, छत्रपती संभाजीनगर | रु.१७,३०,०००/- |
| ६ | राजाराम महविद्यालय, कोल्हापूर | रु.१७,३०,०००/- |
| | **एकूण : (अक्षरी रुपये एक कोटी पांच लाख ऐंशी हजार फक्त)** | **रु.१,०५,८०,०००/-** |

२. सदर तरतूद जिल्हाधिकारी, सोलापूर, हिंगोली, पुणे, अमरावती, छत्रपती संभाजीनगर, कोल्हापूर यांचेकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरीता जिल्हाधिकारी हे नियंत्रक अधिकारी आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व खर्च मंजूर केलेल्या निधीच्या मर्यादेत ठेवण्यात यावा. केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) विहित मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची आणि महालेखापालांच्या लेख्याशी खर्चाचा ताळमेळ घालण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी,

सोलापूर, हिंगोली, पुणे, अमरावती, छत्रपती संभाजीनगर, कोल्हापूर यांची राहील. तसेच अतिप्रदान व अखर्चित निधी परतावा शासनास भरणा (जमा) करण्याबाबत वित्त विभागाच्या सूचनांनुसार संबधित जिल्हाधिकारी यांनी कार्यवाही करावी.

४. सदरचा खर्च करताना वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C. च्या मार्गदर्शक तत्वांचा / CAG च्या निदेशानुसार कोणताही शासन निर्णय/अटी व शर्तींचा भंग होणार नाही याची दक्षता संबधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी जिल्हाधिकारी यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

५. सदरचा खर्च मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसंख्यांक समाजातील वसतीगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२), ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) या लेखाशिर्षांतर्गत सन २०२४-२५ करिता उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, उपविभाग-एक मधील अट क्र.२७ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं -२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४ मधील कार्यपद्धती व अटींची पुर्तता करुन निर्गमित करण्यात येत आहे. प्रस्तावास अनौपचारिक संदर्भ क्र.४८७/१४७१, दिनांक ११ डिसेंबर,२०२४ अन्वये नियोजन विभागाची मान्यता प्राप्त झाली आहे. तसेच अनौपचारिक संदर्भ क्र.४४१/२०२४/व्यय-१, दिनांक १ जानेवारी, २०२५ अन्वये वित्त विभागाची मान्यता प्राप्त झाली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०२५०३२०१८०८०३७३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by MILIND PADMANABH SHENOY
Date: 2025.03.20 18:10:42 +05'30'

**( मिलिंद शेणॉय )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई / नागपूर,
२. महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व परीक्षा), मुंबई / नागपूर,
३. जिल्हाधिकारी, सोलापूर, हिंगोली, पुणे, अमरावती, छत्रपती संभाजीनगर, कोल्हापूर
४. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई,
५. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई
६. प्राचार्य/अध्यक्ष/संचालक (शासकीय तंत्रनिकेतन, सोलापूर, शासकीय तंत्रनिकेतन, लिंबाळा, हिंगोली, शासकीय तंत्रनिकेतन, पुणे, शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती, शासकीय विज्ञान संस्था, छत्रपती संभाजीनगर, राजाराम महविद्यालय, कोल्हापूर)

७. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मुंबई,

८. कक्ष अधिकारी, का.७, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी उक्त रकमा संबंधिताना कृपया B.D.S. वर तात्काळ उपलब्ध करुन देण्यात याव्यात.

९. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर, हिंगोली, पुणे, अमरावती, छत्रपती संभाजीनगर, कोल्हापूर

१०. वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४, व्यय-१) मंत्रालय, मुंबई

११. नियोजन विभाग (कार्या.१४७१)

१२. निवड नस्ती, कार्यासन- ८